**जलसंपदा प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतची कार्यपध्दती.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २००९/(१२७/०९)/जसंनि,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० ऑगस्ट,२००९.

**संदर्भ :**१) शासन निर्णय क्र.संकिर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र), दि.१८.५.९९
२) शासन निर्णय क्र.संकिर्ण २००३/१३(२७७/०३)/जसंनि, दि.४.१२.०३
३) शासन निर्णय क्र.प्रमाअ २००७/(१२८/०७)/जसंनि, दि.११.४.०७

***प्रस्तावना :-***

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये प्रकल्पांचे वर्गीकरण 'अ', 'ब', 'क' आणि 'ड' अशा ४ संवर्गात करण्यात आलेले आहे. त्यातील गट-अ अन्वये ज्या प्रकल्पांचा खर्च प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या मर्यादेत असतांना त्या प्रकल्पाचे सुधारित अंदाजपत्रक प्राप्त झाले आहे व सुधारित अंदाजपत्रकानुसारसुध्दा प्रकल्प विहित मापदंडात बसत आहेत, अशा प्रकल्पांच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचे प्राधिकार पाटबंधारे विभागास असतील अशा प्रकरणी आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने पाटबंधारे विभागाने सुधारित प्रशासकीय मान्यता द्यावी. अशी प्रकरणे व्यय अग्रक्रम समितीला सादर करण्याची आवश्यकता नाही.

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ अन्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार पाटबंधारे महामंडळांना प्रदान करण्यात आलेले आहेत. परंतु हे करत असतांना ज्या प्रकल्पाचा खर्च प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत असतांना त्या प्रकल्पाचे सुधारित अंदाजपत्रक प्राप्त झाले आहे व सुधारित अंदाजपत्रकानुसारसुध्दा प्रकल्प विहित मापदंडात बसत आहे, अशा 'अ' वर्गातील प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार पाटबंधारे महामंडळांना आहेत. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ अंमलात येण्यापूर्वीचा आहे.

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ अन्वये महामंडळांच्या अधिनियमातील कलम २५ व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियमातील कलम ११ (च) परिच्छेद ३ येथील तरतूदीस अनुसरुन जलसंपदा विभागांतर्गत असलेल्या विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ व गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांना त्यांच्या कार्यक्षेत्रांतर्गत विदर्भ मराठवाड्यातील सर्व जिल्ह्यातील मोठे, मध्यम व लघु जलसंपदा प्रकल्प तसेच उपसा सिंचन योजनांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. हे करत असतांना मा.राज्यपाल यांनी अनुशेषासंदर्भात वेळोवेळी दिलेल्या निदेशास अनुसरुन प्राधिकरणाची सहमती आवश्यक आहे. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियमाच्या कलम ११

(च) परिच्छेद १ नुसार नव्याने हाती घेण्यात येणाऱ्या जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी प्राधिकरणाची मान्यता घेणे आवश्यक आहे व कलम ११ (च) परिच्छेद क्र.२ नुसार जलसंपत्ती प्रकल्पांना संबंधिताकडून मान्यता देतांना प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी गुंतवणूकीला अग्रक्रम देण्यासंबंधात मा.राज्यपाल यांनी वेळोवेळी दिलेल्या निदेशांचे काटेकोरपणे पालन होत असल्याबद्दल प्राधिकरण खात्री करणार आहे. तसेच कलम ११ (च) परिच्छेद क्र.३ नुसार मा.राज्यपाल यांच्या निदेशानुसार विदर्भ व मराठवाड्यात अशा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता किंवा सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित पाटबंधारे विकास महामंडळास आहेत. मा.राज्यपाल यांचे पत्र क्र.जीएस/डीबी/आयआरजी-डीआयआर-२३/२००९/ ४९०, दि.७ मे,२००९ नुसार, दिनांक ३१ मार्च,२००८ अखेर सिंचनाचा आर्थिक अनुशेष असलेल्या मराठवाड्यातील जालना व उस्मानाबाद तसेच विदर्भातील बुलढाणा, अकोला, वाशिम व गडचिरोली या ६ जिल्हयातील जलसंपदा योजनांना प्रशासकीय मान्यता देण्यापुरते गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ व विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांचे अधिकार मर्यादित करण्याबाबत सूचित केले आहे.

उपरोक्त शासन निर्णय क्र.२ व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ च्या अनुषंगाने महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ या ३ पाटबंधारे विकास महामंडळांचे जलसंपदा प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती तसेच मा.राज्यपालांच्या दि. ७ मे,२००९ च्या पत्रातील सूचनांच्या अनुषंगाने गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ व विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ या दोन पाटबंधारे विकास महामंडळांचे सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचे अधिकार ६ जिल्ह्यापुरते मर्यादित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याचप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावांना महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची पूर्व मान्यता आवश्यक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) शासन निर्णय क्र. संकीर्ण २००३/१३ (२७७/०३)/जसंनि, दि.४.१२.०३ अन्वये महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ या पाटबंधारे विकास महामंडळांना प्रदान केलेले ‘अ’ वर्गातील जलसंपदा प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार रद्द करण्यात येत आहेत. तथापि गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ व विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांना दिलेले ‘अ’ वर्गातील जलसंपदा प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार मराठवाड्यातील जालना व उस्मानाबाद तसेच विदर्भातील बुलढाणा, अकोला, वाशिम व गडचिरोली या ६ जिल्ह्यांपुरते मर्यादित करण्यात येत आहेत, उर्वरित

'ब' 'क' आणि 'ड' या वर्गातील सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव अर्थातच सर्व महामंडळांनी शासनास सादर करणे आवश्यक आहे.

२) उपरोक्त ६ जिल्ह्यातील 'अ' वर्गातील जलसंपदा प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांचे अधिनस्त मुख्य अभियंता यांनी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता घ्यावी व नंतरच असे सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव महामंडळास सादर करावेत. महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ या ३ पाटबंधारे महामंडळांच्या कार्यकारी संचालकांनी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता घेऊन नंतर सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव शासनास सादर करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २००९०८२०१७२५२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(व्यं.वि. गायकवाड)
सचिव (जलसंपदा)

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री जलसंपदा (कृखोपामं वगळून) व लाक्षेवि, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री जलसंपदा (कृखोपामं), मंत्रालय, मुंबई.
६) मा. राज्यमंत्री जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई, महाराष्ट्र- २ नागपूर
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र- १, मुंबई, महाराष्ट्र- २ नागपूर.
१२) सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सचिव(लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सचिव,महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१५) कार्यकारी संचालक, सर्व पाटबंधारे विकास महामंडळे.
१६) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,(क्षेत्रिय कार्यालये).

१९) सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) सर्व क्षेत्रिय अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२२) सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
२३) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) जसंअ/जसंनि/जसंआ कार्यासन संग्रहार्थ.